**मराठी भाषा विभाग (खुद्द) साठी बाह्ययंत्रणेकडून १ वर्षासाठी वाहनचालक पुरविण्यासाठी करारनामा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## मराठी भाषा विभाग
### शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१८/प्र.क्र.८०/ आस्था-१,

८ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २८ जून, २०१८.

वाचा :

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक पदनि-२०१०/८४/१०/वि.सु.-१, दि.२७.९.२०१०.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक पदनि-२०१३/प्र.क्र.११/१३/वि.सु.-१, दि.२.२.२०१३.
३) मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.८०/ आस्था-१, दि.३०.०६.२०१७.
४) उदयोग,उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.काआआ-२०१३/प्र.क्र.२३३/कामगार-८, दि.०८.०६.२०१४.

## शासन निर्णय :

मराठी भाषा विभाग (खुद्द) करिता संदर्भ क्र.२ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दि.२.२.२०१३ मधील तरतुदीनुसार विभागातील वाहनचालकांची रिक्त पदे बाह्ययंत्रणेद्वारे भरण्याकरिता दरपत्रके मागविण्यात आली. त्यापैकी संदर्भ क्र.३ नुसार मे. गुरु मॅनपॉवर कन्सल्टंट, मुंबई या संस्थेची दि.१.७.२०१७ ते दि.३०.६.२०१८ या कालावधीसाठी निवड करण्यात आली होती. सदर संस्थेची मुदत दि.३०.६.२०१८ रोजी संपुष्टात येत असून त्यांनी पुढील कालावधी वाढविण्यास नकार दिला आहे. सबब संदर्भ क्र.४ नुसार उदयोग, उर्जा व कामगार विभाग यांनी बाहययंत्रणेद्वारे शासनस्तरावर मनुष्यबळ पुरविण्याकरिता मे.ब्रिक्स फॅसिलिटीज प्रा.लि. व मे.क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्विसेस प्रा.लि. या दोन निविदाकारांचे पॅनल तयार करुन त्यास ३ वर्षाकरिता मंजूरी प्रदान केली असून दि.११.०९.२०१७ च्या पत्रानुसार सदर पॅनलला मुदतवाढ दिली असल्याने सदर पॅनलमधून कंत्राटी पध्दतीने वाहनचालक पुरविण्याकरिता दरपत्रक मागविण्यात आले त्यानुसार मे. क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्विसेस प्रा. लि., नं.१७, क्रिस्टल हाऊस, डॉ.मनकीकर मार्ग, सायन, मुंबई-४०० ०२२ या संस्थेची निवड करण्यात आली आहे.

२. उपरोक्त संस्थेला दि.१.४.२०१८ ते दि.३१.३.२०१९ या कालावधीसाठी खालील नमूद केलेल्या दराने आणि सोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ मधील अटी व शर्तीनुसार या विभागास वाहनचालक पुरविणे बंधनकारक राहील.

<u>वाहनचालकाचे दर</u>

| सेवापुरवठादाराचे नाव | प्रति वाहनचालक प्रतिमाह दर (सेवाकर अंतर्भूत) | अतिकालिक भत्ता | मुंबई / बृहन्मुंबई (मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण हद्दी) बाहेरील भत्ता | वाहनचालकास रात्री १०.०० वाजल्यानंतर थांबावे लागल्यास जेवण भत्ता | वाहनचालकास रात्री ११.०० वाजल्यानंतर थांबावे लागल्यास प्रवास भत्ता |
|---|---|---|---|---|---|
| मे. क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्विसेस प्रा. लि. | रु.२१,००६/- | रु.४०/- प्रति तास* | रु. ३०० /- प्रतिदिन | रु.१५०/- | रु.२०० /- |

* अतिकालिक भत्ता हा दिवसाच्या कामाचे ८ तास झाल्यावर १ तासानंतर म्हणजेच ९ तास पूर्ण झाल्यावर लागू होईल.

३. उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडएफ-०१, २०५२-सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा, (०९०) सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा, (०९०) सेक्रेटरिएट (००) (०१) मराठी भाषा विभाग, (१३) कार्यालयीन खर्च (२०५२ ५०५४)" या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय हा वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम/ भाग-२, दि.१७.४.२०१५ अन्वये प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२८११०८४५८७३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Aishvarya N Govekar
Digitally signed by Aishvarya N Govekar
Date: 2018.06.28 17:16:30 +05'30'

**(ऐश्वर्या नि.गोवेकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.

२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंर्ब.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
५. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा / विनियम), मंत्रालय, मुंबई.
६. कक्ष अधिकारी (रोख शाखा), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, मे. क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्विसेस प्रा.लि., नं१७, क्रिस्टल हाऊस, डॉ. मनकीकर मार्ग, सायन, मुंबई ४०० ०२२.
८. निवड नस्ती.

**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१८/प्र.क्र.८०/ आस्था-१, दि. २८ .०६.२०१८ सोबतचे**

**परिशिष्ट-अ**

**<u>अटी व शर्ती</u>**

१) सदर पदांची नेमणूक ही पूर्णत: कंत्राटी पध्दतीने असेल.

२) या पदावरील कर्मचारी यांना शासकीय कर्मचारी म्हणून गणले जाणार नाही.

३) सदर दर दि.१.७.२०१८ ते दि.३०.६.२०१९ या १ वर्षाच्या कालावधीसाठी लागू राहतील.

४) वाहनचालक भारतीय नागरिक असावा तसेच तो किमान दहावी उत्तीर्ण असावा. त्यास मराठी लिहिता/वाचता/बोलता येणे आवश्यक राहील.

५) सेवापुरवठादारातर्फे पुरविण्यात येणारा वाहनचालक गुन्हेगारी पार्श्वभूमीचा किंवा प्रवृत्तीचा नसावा.

६) वाहनचालकासोबत त्याचा वाहन चालविण्याचा परवाना, त्याचे ओळखपत्र (आधारकार्ड, निवडणूक कार्ड, पॅन काई इत्यादीपैकी एक) त्याच्याजवळ असणे आवश्यक आहे व त्याची झेरॉक्स प्रत विभागास सादर करणे आवश्यक राहील.

७) वाहनचालकांचे पोलीस तपासणी अहवाल देणे बंधनकारक राहील.

८) वाहनचालकाने वर्दीवर असताना नशापान / धुम्रपान व तंबाखुजन्य पदार्थांचे सेवन करु नये.

९) वाहनास अपघात झाल्यास व दुर्दैवाने वाहनचालकास गंभीर स्वरुपात इजा झाल्यास वाहनचालकास वैद्यकीय खर्चाची अथवा नुकसान भरपाईचे कोणतेही दायित्व शासनाकडे असणार नाही. त्याची जबाबदारी संबंधित सेवापुरवठादारावर राहील.

१०) कंपनी / संस्थेतर्फे काम करणाऱ्या वाहनचालकाच्या सेवेचे कोणतेही उत्तरदायित्व शासनावर राहणार नाही.

११) वाहनचालकाचे किमान वय १८ वर्षे आणि कमाल वय ५८ वर्षापेक्षा जास्त नसावे.

१२) मराठी भाषा विभागाच्या आवश्यकतेनुसार वाहनचालकाची मागणी केली जाईल.

१३) वाहनचालकास साप्ताहिक सुट्टी रविवारची राहील. तसेच त्याला रविवारी सुट्टीच्या दिवशी कामावर बोलविल्यास त्या दिवसाकरिता मासिक ठोक दराच्या सरासरीने प्रतिदिन दराने वेतन अनुज्ञेय राहील.

१४) सेवापुरवठादाराने कंत्राटी कर्मचारी पुरविल्यानंतर त्यांच्याबाबतचा मोबदला हा मासिक तत्वावर, सेवापुरवठादाराने दुहेरी प्रतीमध्ये बिल व पुरविलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांचे हजेरीपत्रक सादर केल्यानंतर ३० दिवसांच्या आत देण्यात येईल. कंत्राटी कर्मचाऱ्यांचा पुरवठा करण्यासाठी तसेच

मोबदला देण्यास कोणत्याही कारणास्तव उशीर झाला तर त्यावर कोणत्याही प्रकारचे व्याज अनुज्ञेय राहणार नाही.

१५) अ) पुरविण्यात आलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्याचे काम समाधानकारक नाही असे निदर्शनास आल्यास, त्याऐवजी पर्यायी उमेदवार तात्काळ उपलब्ध करण्याची जबाबदारी सेवापुरवठादाराची राहील.

५) ब) पुरविण्यात आलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांचे काम वारंवार सूचना देऊनही समाधानकारक होत नाही किंवा त्यात सुधारणा होत नाही असे निदर्शनास आल्यास, देण्यात आलेले कंत्राट, कोणत्याही प्रकारची पूर्व सूचना न देता रद्द करण्यात येईल.

१६) पुरविण्यात आलेले कंत्राटी कर्मचाऱ्यांनी कामाच्या ठिकाणी कार्यालयाची सुरक्षा, गोपनीयता, वर्तणूक, राजशिष्टाचार आदि बाबतच्या नियमाचे पालन करणे बंधनकारक राहील व त्याचे ते पालन करतील याची जबाबदारी सर्वस्वी सेवापुरवठादाराची राहील.

१७) सेवापुरवठादाराचे पुरविण्यात आलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्याबाबत कोणत्याही प्रकारचे कायद्याचे उल्लंघन झाल्यास त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी ही सेवापुरवठादाराची राहील व त्या अनुषंगाने झालेली कोणत्याही प्रकारची नुकसान भरपाई ही सेवापुरवठादाराला भरावी लागेल.

१८) सेवापुरवठादाराच्या व त्याने पुरविलेल्या कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या निष्काळजीपणामुळे विभागातील कर्मचाऱ्यांच्या तसेच शासनाच्या वाहनाची काळजी व उपसाधनांची काळजी व देखभाल करणे आवश्यक आहे. विभागाच्या मालमत्तेला कोणत्याही प्रकारची हानी पोहचल्यास तिची सर्वस्वी जबाबदारी सेवापुरवठादाराची राहील.

१९) आयकर अधिनियमाप्रमाणे सेवापुरवठादाराच्या देयकातून आयकराची वजावट करण्यात येईल.

२०) बाह्ययंत्रणेद्वारे काम करुन घेणाऱ्या सेवापुरवठादाराने शासनाने निर्धारित केलेल्या वेतन दराप्रमाणे वेतन व वेळोवेळी लागू असलेले कर व अनुज्ञेय भत्ते अदा करणे बंधनकारक राहील. सेवापुरवठादाराकडून उपलब्ध करुन दिलेल्या मनुष्यबळाला देय असलेले कायदेशीर दायित्व. उदा.भविष्य निर्वाह निधी, ईएसआयसी, बोनस, लेबर वेल्फेअर फंड, रजा रोखीकरण इत्यादींचा समावेश वेतनात अंतर्भूत असून संबंधित प्राधिकरणाकडे कायदेशीर दायित्व जमा करण्याची जबाबदारी सेवापुरवठादाराची राहील.

२१) या कंत्राटाच्या अटी व शर्तीचा अर्थ लावण्याच्या अनुषंगाने अथवा कोणताही वाद उद्भवल्यास सदर प्रकरणी प्रधान सचिव, मराठी भाषा विभाग यांनी निर्णय घ्यावा. सदर निर्णयाने पक्षकाराचे समाधान न झाल्यास सदर बाबीबाबत शासन निर्णय घेईल व शासनाचा निर्णय अंतिम समजण्यात येईल.

२२) सदर कंत्राटाच्या अनुषंगाने कोणतेही न्यायिक वाद उद्भवल्यास, सदर वाद मुंबई महानगर कार्यालयाच्या मुख्यालयास्थित (ठिकाणी न्यायालयाच्या अधिकारी) क्षेत्रात येईल.

२३) कराराचे पालन समाधानकारकपणे न झाल्यास करारनामा केव्हाही संपुष्टात आणणे तसेच कराराची मुदत वाढविणे याबाबतचा अंतिम निर्णय मराठी भाषा विभागाचा राहील.

२४) सेवापुरवठादारास दरकरार संपुष्टात आणावयाचा झाल्यास आगाऊ तीन महिन्याची नोटीस देणे त्यास बंधनकारक राहील.

२५) करारातील अटी व शर्ती मान्य असल्याबाबत व विहित वेळेत वाहनचालक पुरविण्याबाबत रु.१००/- च्या स्टँप पेपरवर करारनामा करुन देणे आवश्यक आहे.

******